“महाराष्ट्र राज्य ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा” आयोजित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण १०२२/प्र.क्र.४७/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०३ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय समक्रमांक दि. ३०.१२.२०२२

२) आयुक्त क्रीडा व युवक सेवा यांचे क्र. मराऑक्री/आ. व्यवहार/प्रस्ताव/२०२२-२३/का- ६/८०५२/दि.१५.०२.२०२३

प्रस्तावना -

दि. २ ते १२ जानेवारी, २०२३ या कालावधीत राज्यातील विविध आठ जिल्हयांत ३७ खेळप्रकारात महाराष्ट्र राज्य ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धांचे यशस्वी आयोजन करण्यात आलेले आहे. स्पर्धेच्या अनुषंगाने विविध बाबींच्या निविदा प्रक्रिया राबविण्यात आलेल्या होत्या. तसेच संबंधित कंत्राटदारांनी त्यांच्या कामाचे देयक संचालनालयास सादर केलेले आहेत. सदर देयक संबंधितांना अदा करण्यासाठी दि. ३०.१२.२०२२ च्या शासन निर्णयानुसार संयुक्त स्वाक्षरीने कार्यवाही करण्यासाठी महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनचे महासचिव यांची सेवा वेळोवेळी अथवा आवश्यकतेनुसार उपलब्ध होत नाही. त्यांच्या व्यस्त कामामुळे ते या कामास वेळ देऊ शकत नाहीत असे आयुक्त क्रीडा व युवक सेवा यांनी संदर्भ क्र.२ अन्वये कळविलेले आहे. सदरची स्पर्धा संपन्न होऊन जवळपास एक महिना पुर्ण झालेला असून संबंधित कंत्राटदाराची देयके विहित वेळेमध्ये अदा करणे शक्य होत नाही. यास्तव संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील परि.क्र. ३ “महाराष्ट्र राज्य ऑलिंपिक क्रीडा स्पर्धा” स्पर्धेचे आर्थिक व्यवहार यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

आता संदर्भाधीन क्र.१ येथील दि.३०.१२.२०२२ च्या शासन निर्णयातील परि.क्र.३ खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे.

“महाराष्ट्र राज्य ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा करिता शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीसाठी लेखाधिकारी ,क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य हे आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य हे नियंत्रक अधिकारी राहतील .

तसेच संबंधित निधी आहरित करून मुख्य स्पर्धा आयोजन समितीच्या बँक खात्यात वर्ग करण्यात यावा. मुख्य स्पर्धा आयोजन समितीचे सदस्य सचिव ( उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा मुख्यालय, पुणे) आणि लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचलनालय महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संयुक्त स्वाक्षरीने आर्थिक व्यवहार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०३१८४५५८०३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2023.03.13 11:12:28 +05'30'

**( रामदास धुमाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य
७) अपर मुख्य सचिव नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई-.
८) अपर मुख्य प्रधान सचिव वित्त विभाग मंत्रालय, मुंबई-.
९) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१३) सर्व एकविध राज्य संघटना व महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशन (संचालनालयामार्फत)
१४) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
१५) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१६) ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१७) कक्ष अधिकारी (क्रीयुसे - १, क्रीयुसे -३)
१८) निवडनस्ती, क्रीयुसे-२.